**विद्युत निरीक्षणालयाच्या समस्यांचे निराकरण करण्यासाठी संक्रमण काळ समन्वय समिती गठीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण -२०१४/प्र.क्र. ५८८(२) /ऊर्जा-२**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २४ एप्रिल, २०१५.

वाचा :- १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. मुअवि-००५/सी.आर.८९५७/ऊर्जा-२ दिनांक २०/०२/२००६

२) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण -२०१४/प्र.क्र. ५८८ /ऊर्जा-२, दिनांक २६.०२.२०१५.

३) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण -२०१४/प्र.क्र. ५८८/(भाग-१)/ ऊर्जा-२, दिनांक २४ /०४/२०१५.

**प्रस्तावना :**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय क्र. मुअवि-००५/सी.आर.८९५७/ऊर्जा-२ दिनांक २०/०२/२००६ नुसार विद्युत निरीक्षणालयासाठी १०५० पदांचा आकृतीबंध मंजूर आहे. तथापि, ती सर्व पदे मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली कार्यरत होती.

२. विद्युत निरीक्षणालयाची कामे ऊर्जा विषयक बाबींशी निगडीत असल्याने , विद्युत कायदा- २००३ ची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याकरीता सदर निरिक्षणालय हे ऊर्जा विभागांतर्गत असणे आवश्यक वाटल्याने मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार शासन निर्णय क्र. संकीर्ण- २०१४/प्र.क्र.५८८/ऊर्जा-२ दिनांक २६/०२/२०१५ अन्वये सदर निरीक्षणालयाचे कामकाज ऊर्जा विभागांतर्गत हस्तांतरण करण्याबाबत आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सद्यस्थितीत विद्युत निरीक्षणालय हे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून ऊर्जा विभागाकडे हस्तांतरीत झाले आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१२ च्या शासन निर्णयानुसार सार्वजनिक बांधकाम विभागाचे अधिकारी, कर्मचारी विद्युत निरीक्षणालयात कार्यरत आहेत. त्यांना त्यांच्या मुळ विभागात प्रत्यार्पित करणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने निर्माण होणाऱ्या विद्युत निरीक्षणालयाच्या संबंधित आस्थापनाविषयक समस्यांचे निराकरण करण्याकरीता संक्रमण काळ समन्वय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

संक्रमण काळ समन्वय समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| प्रधान सचिव (ऊर्जा) | - | अध्यक्ष |
| अधिक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत मंडळ, सा.बां.वि., नागपूर | - | सदस्य |
| उप /सह सचिव (ऊर्जा) | - | सदस्य |
| उप/सह सचिव (प्रशासन), सा.बां.वि. | - | सदस्य |
| श्री. कि.दे.महाजन (से.नि.वि.नि.), संघटना प्रतिनिधी | - | सदस्य |
| श्री हरिदर्शन सोनावणे,सहाय्यक अभियंता-२, संघटना प्रतिनिधी | - | सदस्य |
| मुख्य विद्युत निरिक्षक (प्रभारी) | - | सदस्य सचिव |

२. या समितीने अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सेवा विषयक बाबींच्या समस्यांचे निराकरण करण्यासाठी आवश्यकतेनुसार सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाच्या सल्ल्याने पुढील कार्यवाही करावी. यामध्ये कर्मचाऱ्यांचे विकल्प घेणे, संवर्ग निश्चिती, संवर्गाची जेष्ठता निश्चिती व अतिरिक्त पदे निर्माण करण्याबाबत अथवा अतिरिक्त झालेली पदे समर्पित करण्याबाबत शिफारस करणे इत्यादी कामांचा समावेश राहील.

३. वरील समितीच्या सदस्यांना प्रचलित नियमानुसार देय व अनुज्ञेय असलेले भत्ते नियमानुसार देण्यात येतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०४२४१२३६४२८९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

INAMDAR SIRAJ MANJAMIYA

Digitally signed by INAMDAR SIRAJ MANJAMIYA
DN: CN = INAMDAR SIRAJ MANJAMIYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = INDUSTRY ENERGY AND LABOUR,CID - 918056
Date: 2015.04.24 18:41:07 +05'30'

**(सि.मं.इनामदार)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत,**

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री(ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (सा.बां.वि.) यांचे खाजगी सचिव
मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद,विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
अपर मुख्य सचिव (सा.बां.वि.), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (सा.प्र.वि.), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
अध्यक्ष, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, सेंटर नं. १, १३वा मजला, कुलाबा,मुंबई ०५.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज मंडळ सुत्रधारी कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व),मुंबई-५१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी, प्रकाशगंगा, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई
अवर सचिव (रोखशाखा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, (प्रशासन-२), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी, (१४६१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.